**शाळा व कनिष्ठ महाविद्यालयांमध्ये दरवर्षी दिनांक २५ जानेवारी रोजी राष्ट्रीय मतदार दिन साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र. १२७/एसडी-६**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ३० डिसेंबर, २०२१.**

**वाचा:-**
१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे परिपत्रक क्र.संकीर्ण - २०२१/ प्र.क्र.१२७/ एसडी-६, दि.२७ सप्टेंबर, २०२१
२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी यांचे अर्धशासकीय पत्र क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.८००/२१/३३, दिनांक : २० डिसेंबर, २०२१.

**परिपत्रक**

दि.२५ जानेवारी, १९५० रोजी भारत निवडणूक आयोगाची स्थापना झाली. भारत निवडणूक आयोगाचा हा स्थापना दिवस २०११ पासून संपूर्ण देशभरात -राष्ट्रीय मतदार दिन◦ म्हणून साजरा केला जातो. राष्ट्रीय मतदार दिन साजरा करण्याचा मुख्य उद्देश हा मतदारांना, विशेषतः नवमतदारांना मतदार यादीत नाव नोंदणीसाठी प्रोत्साहन देणे, सुलभरीत्या त्यांची नाव नोंदणी करून घेणे, हा आहे. देशातील मतदारांना समर्पित केलेल्या या दिवसाचा उपयोग मतदारांचा निवडणूक प्रक्रियेतील सहभाग वाढावा म्हणून त्यांना जागरूक करण्यासाठी केला जातो. राष्ट्रीय मतदार दिनाच्या कार्यक्रमात नवमतदारांचा सत्कार करून त्यांना मतदार ओळखपत्र दिले जाते.

या पार्श्वभूमीवर सुजाण आणि जबाबदार नागरिक घडविण्यासाठी महाराष्ट्रातील सर्व मंडळाच्या सर्व माध्यमांच्या शाळांमध्ये (इयत्ता नववी आणि दहावी) आणि सर्व कनिष्ठ महाविद्यालयांमध्ये २५ जानेवारी रोजी राष्ट्रीय मतदार दिन दरवर्षी अनिवार्यपणे साजरा करण्यात यावा. सदर दिवशी पुढीलप्रमाणे कार्यक्रमाचे आयोजन करण्यात यावे :

- शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने जारी केलेल्या परिपत्रकानुसार शाळेत (इयत्ता नववी व दहावी) आणि कनिष्ठ महाविद्यालयांमध्ये स्थापन केलेल्या निवडणूक साक्षरता मंडळ या व्यासपीठांतर्गत सदर दिवशी विद्यार्थ्यांसाठी विविध स्पर्धा घेण्यात याव्यात. उदा. निबंध, वक्तृत्व, रांगोळी, चित्रकला, भित्तिपत्रक (पोस्टर), रील (एक मिनिटांचे व्हिडिओ), मीम, गाणे, विडंबन काव्य, घोषवाक्य इ. स्पर्धा. (मताधिकार, लोकशाही या संबंधीच्या सर्वसमावेशक स्पर्धांच्या विषयांची नमुन्यादाखल यादी सोबत जोडलेल्या परिशिष्ट १ मध्ये देण्यात आली आहे.)

- मताधिकार, लोकशाही यासंबंधी परिसंवाद, व्याख्यान यांचे आयोजन करावे.
- विद्यार्थ्यांसोबत लोकशाहीवर निष्ठा ठेवण्यासंबंधी शपथ घेण्याचा कार्यक्रम घेण्यात यावा. (मराठी, हिंदी आणि इंग्रजी भाषांतील शपथेचा नमुना सोबत जोडलेल्या परिशिष्ट २ मध्ये देण्यात आलेला आहे.)
- दरवर्षी राष्ट्रीय मतदार दिन साजरा करण्यासाठी राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांनी त्यांच्या स्तरावरुन दरवर्षी सर्व शाळांना निर्देश देण्यात यावेत.

उपरोल्लिखित उपक्रमांशिवाय शाळा व कनिष्ठ महाविद्यालयांना इतरही पद्धतीने राष्ट्रीय मतदार दिन साजरा करता येईल. तसेच, सदर कार्यक्रम साजरा करताना कोविड-१९ संबंधी शासनाच्या नियमांचे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२३०१६४२२२०७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2021.12.30 16:43:39 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
४) मा. मंत्री, ( शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव.
५) मा. राज्यमंत्री, ( शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव.
६) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव तथा मुख्य निवणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
८) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
१०) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.
११) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) संचालक, बालभारती,
१४) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
१५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

१६) सर्व उपसंचालक (क्रीडा)
१७) प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था सर्व,
१८) राज्य संचालक, नेरुन युवा केंद्र संगठन, मुंबई,
१९) अध्यक्ष, केंद्र माध्यमिक शिक्षा बोर्ड, (सीबीएसई), नवी दिल्ली,
२०) संचालक, भारतीय शाळा प्रमाणपत्र परीक्षण परिषद (आयसीएसई), नवी दिल्ली
२१) संचालक, इंटरनॅशनल बॅकेलॉरिएट (आयबी), नवी दिल्ली,
२२) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक)/ सर्व शिक्षण निरिक्षण बृहन्मुंबई महानगरपालिका,
२३) प्रशासन अधिकारी महानगरपालिका सर्व,
२४) निवड नस्ती (कार्या.एसडी-६)

## परिशिष्ट १

**स्पर्धांसाठी विविध विषयांची यादी पुढीलप्रमाणे :**

- सक्षम लोकशाहीची पहिली पायरी – मतदार नोंदणी
- वर्गप्रमुख पदाची निवडणूक मी अशी लढवणार...
- माझा नगरसेवक/सरपंच असा हवा...
- मी नगरसेवक/सरपंच झालो / झाले तर...
- मी आमदार झालो / झाले तर...
- माझा आमदार असा हवा...
- मी खासदार झालो / झाले तर...
- माझा खासदार असा हवा
- एका बोटावरच्या शाईची किंमत?
- मी मताधिकार बजावणार कारण...
- अठराव्या वर्षाची जबाबदारी

********

परिशिष्ट २

राष्ट्रीय मतदार दिवस

मतदारांसाठी प्रतिज्ञा

# मराठी

“आम्ही, भारताचे नागरिक, लोकशाहीवर निष्ठा ठेवून, याद्वारे, प्रतिज्ञा करतो की, आपल्या देशाच्या लोकशाही परपरांचे जतन करु आणि मुक्त नि:पक्षपाती व शांततापूर्ण वातावरणातील निवडणूकांचे पावित्र्य राखू व प्रत्येक निवडणूकीत निर्भयपणे तसेच धर्म, वंश, जात, समाज, भाषा यांच्या विचारांच्या प्रभावाखाली न येता किंवा कोणत्याही प्रलोभनास बळी न पडता मतदान करु.”

# हिंदी

“हम, भारत के नागरिक, लोकतंत्र मे. अपनी पूर्ण आस्था रखते हुए यह शपथ लेते हैं की हम अपने देश की लोकतांत्रिक परम्पराओंकी मर्यादा को बनाए रखेंगे तथा स्वतंत्र, निष्पक्ष एवं शांतिपूर्ण निर्वाचन की गरिमा को अक्षुण्ण रखते हुए, निर्भीक होकर, धर्म, वर्ग, जाति, समुदाय, भाषा अथवा अन्य किसी भी प्रलोभन से प्रभावित हुए बिना सभी निर्वाचनो में अपने मताधिकार का प्रयोग करेंगे.”

# English

**“We, the citizens of India, having abiding faith in democracy, hereby pledge to uphold the democratic traditions of our country and the dignity of free, fair and peaceful elections, and to vote in every election fearlessly and without being influenced by considerations of religion, race, caste, language or any inducement.”**

*****************